सन २०१०-२०११
ट्रायसेम प्रशिक्षण केंद्र व लघु औद्योगिक प्रशिक्षण संस्था केंद्रात कार्यरत असलेल्या कंत्राटी कर्मचाऱ्यांच्या मानधनात वाढ करणेबाबत.

# महाराष्ट्र शासन

## ग्राम विकास व जलसंधारण विभाग

शासन निर्णय क्र. ट्रायसेम -१००८/प्र.क्र. ६८/यो-६
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक : 22 आक्टोंबर,२०१०

**संदर्भ:-** १) ग्राम विकास व जलसंधारण विभाग, शासन निर्णय क्र.ग्रायुप्र-१०९०/सीआर ६६१/५५, दिनांक १ मार्च, १९९०
२) ग्राम विकास व जलसंधारण विभाग, शासन निर्णय क्र.ग्रायुप्र-११९५/सीआर १५७३/५५, दिनांक १४ नोव्हेंबर, १९९६
३) ग्राम विकास व जलसंधारण विभाग, शासन निर्णय क्र.ग्रायुप्र-११९६/सीआर १६७४/५५, दिनांक ३० जून, १९९७
४) ग्राम विकास व जलसंधारण विभाग, शासन निर्णय क्र.ग्रायुप्र-१०९६/सीआर ६६३/१४०, दिनांक ८ फेब्रुवारी,२०००.

प्रस्तावना :

केंद्र शासनाच्या मार्गदर्शक तत्वानुसार राज्यामध्ये ट्रायसेम प्रशिक्षण व लघु औद्योगिक प्रशिक्षण संस्था केंद्र संदर्भ क्र.१ व २ नुसार सुरु करण्यात आलेले आहे. सदरची ट्रायसेम प्रशिक्षण व लघु औद्योगिक प्रशिक्षण संस्था केंद्रे संदर्भ क्र.४ नुसार चालू ठेवण्याचा निर्णय घेण्यात आलेला आहे. सद्य:स्थितीत राज्यात १९ ट्रायसेम प्रशिक्षण केंद्रे व २० लघु औद्योगिक प्रशिक्षण संस्था केंद्रे चालू आहेत. या प्रशिक्षण केंद्रात विविध संवर्गातील १८९ कंत्राटी स्वरुपाचे कर्मचारी ठराविक मानधनावर कार्यरत आहेत.

२. सदर योजना चालू असल्यामुळे ग्रामीण भागातील बेरोजगार व कमी शिक्षण घेतलेल्या तरुणांना निरनिराळया लघु व्यवसायांचे प्रशिक्षण देवून कुशल कामगार / कारागीर होण्यास मदत झालेली आहे. परंतु ट्रायसेम प्रशिक्षण व लघु औद्योगिक प्रशिक्षण संस्था केंद्रांमध्ये कार्यरत असलेल्या कंत्राटी कर्मचा-यांच्या मानधनात गेल्या १४-१५ वर्षापासून वाढ झालेली नसल्याने व ग्रामीण भागातील दारिद्रय रेषेखालील १८ ते ३५ वयोगटातील बेरोजगार युवक युवतींना प्रशिक्षण देण्याचे हे महत्वाचे माध्यम

असल्याने तेथील कंत्राटी कर्मचा-यांच्या मानधनात वाढ करुन सदर प्रशिक्षण केंद्रे सक्षम बनविण्याच्या दृष्टीकोनातून त्यांच्या मानधनात वाढ करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधिन होता.

**शासन निर्णय :**

राज्यातील ट्रायसेम प्रशिक्षण व लघु औद्योगिक प्रशिक्षण संस्था केंद्रे व त्यातील प्रशिक्षणाचे कामकाज पुढे चालू ठेवून या केंद्रात कार्यरत असलेल्या कंत्राटी कर्मचा-यांना देण्यात येणा-या मानधनात खालील तक्त्यात दर्शविलेली वाढ करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | पदाचे नांव | पदांची संख्या | एका पदासाठी सध्याचे मानधन | एका पदासाठी वाढवून दिलेले मानधन | एका पदासाठी वाढीनंतरचे एकूण मानधन |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | गट निदेशक | ४ | ३३०० | ३२०० | ६५०० |
| २ | निदेशक | १२१ | २९०० | २६०० | ५५०० |
| ३ | लिपीक | १७ | १००० | ३००० | ४००० |
| ४ | शिपाई | ४७ | ८०० | २२०० | ३००० |

२. वरील तक्त्यात दर्शविलेली वाढ ही खालील अटी व शर्थींच्या अधीन राहून मान्यता देण्यात येत आहे.

१) संदर्भ क्र.१, २ व ४ येथील शासन निर्णयातील अटी जशाच्या तशा लागू राहतील.

२) ट्रायसेम प्रशिक्षण व लघु औद्योगिक प्रशिक्षण संस्था केंद्र ही योजना जिल्हास्तरीय असल्याने या केंद्रासाठी लागणा-या आवश्यक तेवढया निधीची जिल्हा नियोजन समिती यांनी नियोजन विभागास शिफारस करावी व नियोजन विभागाने या केंद्रासाठी आवश्यक ती तरतूद उपलब्ध करावी.

३) ट्रायसेम प्रशिक्षण व लघु औद्योगिक प्रशिक्षण संस्था केंद्रामध्ये काम करणा-या कंत्राटी कर्मचा-यांच्या मानधनात दिनांक ६ ऑक्टोंबर, २०१० पासून ही वाढ लागू करण्यात येईल.

३. हा शासन निर्णय नियोजन व वित्त विभागाच्या अनुक्रमे अनौपचारीक संदर्भ क्रमांक २०३/१४८१, दि. २२/१०/२०१० व अनौपचारिक संदर्भ क्र.२९८/१०/व्यय-१५, दि.२८/१०/२०१० अन्वये पारीत करण्यात आलेला आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असुन त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०१०११२२१५०९५८००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

( सुधीर ठाकरे )
सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,
१) विभागीय आयुक्त (सर्व)
२) महालेखापाल महाराष्ट्र-१ मुंबई ( लेखा परिक्षा )( लेखा व अनुज्ञेयता ) (जादा ५ प्रतीसह)
३) महालेखापाल महाराष्ट्र-२ नागपूर ( लेखा परिक्षा ) ( लेखा व अनुज्ञेयता ) (जादा ५ प्रतीसह)
४) अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
५) मुख्य लेखा व वित्त अधिकारी , जिल्हा परिषद (सर्व)
६) मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई
७) प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, जिल्हा परिषद (सर्व)
८) उप मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा (सर्व)
९) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
१०) जिल्हा लेखा परिक्षक स्थानिक निधी लेखा (सर्व)
११) नियोजन विभाग, कार्यासन १४३१/१४४४ , मंत्रालय, मुंबई
१२) वित्त विभाग (व्यय-५/अर्थ-१६), मंत्रालय, मुंबई
१३ कार्यासन क्रमांक वित्त-१, वित्त-२, वित्त-६, वित्त-७,वित्त-८, योजना-२,योजना-३, योजना-७, ग्राम विकास व जलसंधारण विभाग.
१४) निवड नस्ती, कार्यासन योजना-६, ग्राम विकास व जलसंधारण विभाग.

-------